अनुसूचित जाती/जमातीच्या लोकांना जात प्रमाणपत्र वैधता प्राप्त करताना येत असलेल्या अडचणींचा अभ्यास करुन त्यावर उपाययोजना सुचविण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसटीसी-२११८/प्र.क्र.२८५/का.१०**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - १४ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग जातीचे प्रमाणपत्र (देण्याचे व त्याच्या पडताळणीचे) अधिनियम २००० व त्याअंतर्गत तयार करण्यात आलेले असून या अधिनियमांतर्गत महाराष्ट्र अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र (देण्याचे व त्याच्या पडताळणीचे विनियमन) नियम २००३ व महाराष्ट्र अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग (जातीचे प्रमाणपत्र देण्याचे व त्याच्या पडताळणीचे विनियमन ) नियम २०१२ मधील तरतूदी नुसार सक्षम प्राधिकाऱ्यांकडून अनुसूचित जमातीच्या व्यक्तींना अनुसूचित जमाती प्रमाणपत्र निर्गमित करण्यात येते. अधिनियम २००० मधील कलम ४ (२) नुसार सदर प्रमाणपत्र हे त्याची तपासणी समित्यांमार्फत तपासणी झाल्यानंतरच वैध असते. राज्यामध्ये सद्यस्थितीत अनुसूचित जाती/जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्या कार्यरत असून त्यांच्यामार्फत अधिनियम २००० व त्याअंतर्गत करण्यात आलेल्या संबधित नियमांमधील तरतूदीनुसार जात प्रमाणपत्राची वैधता तपासण्यात येते. काही कालावधीपासून अनुसूचित जाती/जमाती प्रमाणपत्र वैधता मिळण्यासाठी येत असलेल्या अडचणींबाबत तसेच अस्तित्वातील कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करण्यासाठी अनेक विविध समाजाच्या संघटनांमार्फत शासनास निवेदने प्राप्त झालेली आहेत. तसेच मा. न्यायालय, मा. लोकप्रतिनधी यांनी यासंदर्भात शासनास सुचना केलेल्या आहेत. सदर निवेदनांचा तसेच सुचनांचा विचार करुन अनुसूचित जाती/जमातीच्या लोकांना जात प्रमाणपत्राची वैधता मिळविण्यासाठी येत असलेल्या अडचणींचा अभ्यास करुन त्यावर उपाययोजना सुचविण्यासाठी एक समिती नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यामध्ये विविध अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्गातील व्यक्तींना जात प्रमाणपत्र व वैधता प्रमाणपत्र प्राप्त करण्यात येत

असलेल्या अडचणींचा अभ्यास करुन त्यामध्ये सुधारणा/ उपाय योजना सुचविण्यासाठी खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | श्री पी. व्ही. हरदास<br>मा. उच्च न्यायालयाचे सेवा निवृत्त न्यायाधीश | - | अध्यक्ष |
| २) | प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ३) | प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ४) | सचिव, विमुक्त जाती व भटक्या जमाती विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ५) | सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ६) | या समाजांतील शासन नियुक्त एक तज्ञ व्यक्ती | - | सदस्य |
| ७) | महासंचालक, बार्टी, पुणे | - | सदस्य |
| ८) | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे | - | सदस्य सचिव |

समितीस वरील सदस्याव्यतिरिक्त तज्ञ व्यक्ती अथवा संस्था यांना आवश्यकतेनुसार विचारविनिमय करण्याकरीता बोलाविण्याची मुभा असेल.

सदर समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील :-

**समितीची कार्यकक्षा:**

१) अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग जात प्रमाणपत्र तसेच वैधता प्रमाणपत्र निर्गमित करावयाची सध्याची कार्यपध्दती तसेच अस्तित्वातील कायद्याचा अभ्यास करणे.

२) मा. सर्वाच्च न्यायालय व मा. उच्च न्यायालया मसर्फत यासंदर्भात वेळोवेळी देण्यात आलेले विविध निर्देश व निकालांचा अभ्यास करणे.

३) जात / जमात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांनी निर्गमित केलेल्या वैधता प्रमाणपत्रासंदर्भात मा. न्यायालयांनी नोंदविलेल्या निरिक्षणांचा अभ्यास करणे.

४) वरील सर्व बाबींचा अभ्यास करुन सध्याच्या जात/जमात प्रमाणपत्राची पडताळणी करुन वैधता प्रमाणपत्र निर्गमित करावयाच्या सध्याच्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करण्यासाठी पर्यायी संस्थात्मक संरचना सुचविणे.

५) सदर समिती हया संदर्भात जनतेकडून तसेच कोळी महादेव,कोळी मल्हार,टोकरे कोळी व इतर जमातीच्या व्यक्तींकडून/समुहांकडून देखील प्राप्त झालेले अर्ज/निवेदने विचारात घेईल.

६) सदर समितीचा कालावधी १ महिन्यांचा राहील. समितीने या कालवधीत आपला स्वयंस्पष्ट अहवाल शिफारशीसह शासनास सादर करावा.

समितीचे अध्यक्ष यांना अनुज्ञेय मानधन व इतर भत्ते या बाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्थेमार्फत सदर समितीस आवश्यक असलेल्या सेवा सुविधा पुरविण्यात याव्यात.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०११४१२५७३८९१२४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Laxmikant
Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2019.01.14 13:09:38 +05'30'

**( ल. गो. ढोके )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
५) सर्व मा.विधीमंडळ सदस्य
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
७) श्री. पी. व्ही. हरदास, सेवा निवृत्त न्यायमूर्ती, मा. उच्च न्यायालय
८) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, विमुक्त जाती व भटक्या जमाती विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था( बार्टी ), पुणे.
१३) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१४) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१५) सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास
१६) सर्व सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती
१७) सर्व अध्यक्ष, अनुसूचित जाती प्रमाणपत्र तपासणी समित्या
१८) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१९) सर्व मंत्रालयीन विभाग,
२०) सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवड नस्ती.